**माहिती व जनसंपर्क महासंचालनालयातील माहिती केंद्र, जिल्हा माहिती कार्यालय, नागपूर या कार्यालयाचे कार्यालय प्रमुख जिल्हा माहिती अधिकारी, जिल्हा माहिती कार्यालय, नागपूर यांना घोषित करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन आदेश क्र. संकीर्ण -२०२४/२४८/प्र.क्र.८०/मावज-२(३४-अ)**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक :- ०६ मे, २०२५.

वाचा :- १. वित्त विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण २०१५/प्र.क्र.४१/अर्थ-१, दि.०२.०६.२०१५
२. सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक क्र.संकीर्ण ३५१७/प्र.क्र.१४७/१९-अ, दि. १७.०३.२०१८
२. माहिती व जनसंपर्क महासंचालनालय यांचे पत्र क्र. प्रविस्था-०२(२०२२)/सुधारित आकृतीबंध/का-१/२२३८,०७.०९.२०२२ (पृ.क्र.०३/प.वि.)
३. माहिती व जनसंपर्क महासंचालनालय यांचे पत्र क्र.प्रविसथा-२(२०२४)/मा.कें. नागपूर-छत्रपती संभाजीनगर/का-१/१२५३ व ६९१, दि. ३१.०५.२०२४ व दि.२०.०३.२०२५
४.सामान्य प्रशासन विभाग, शासन आदेश क्र. मावज-२०२४/२४८/प्र.क्र.८०/मावज-२(३४-अ) दिनांक ०६.०५.२०२५

## आदेश

माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाच्या अधिनस्त असलेले माहिती व जनसंपर्क महासंचालनालयातील माहिती केंद्र, जिल्हा माहिती कार्यालय, नागपूर कार्यालयाचे संदर्भाधीन २ रोजीच्या शासन परिपत्रकानुसार सद्यस्थितीमध्ये जिल्हा माहिती अधिकारी(माहिती), माहिती केंद्र, जिल्हा माहिती कार्यालय, नागपूर हे "कार्यालय प्रमुख" आहेत.

माहिती व जनसंपर्क महासंचालनालयात माहिती प्रसारण, प्रसिध्दीच्या कामकाजात अधिक सुसुत्रता यावी आणि समाज-वेब माध्यमांचा वाढलेला वापर लक्षात घेता महासंचालनालयात वित्त विभागाच्या संदर्भाधीन दिनांक ०२.०६.२०१५ रोजीच्या शासन निर्णयानुसार प्रशासकीय विभागाला प्रशासनावर कोणताही विपरित परिणाम न होता, विभागामध्ये एकूण उपलब्ध कर्मचाऱ्यांचे समायोजन करण्याच्या अधिकारानुसार व विभागाच्या ज्या संवर्गाच्या बाबतीत कामांची आवश्यकता कमी झाली आहे अशा संवर्गातील पदांची विभागातील तीच वेतनश्रेणी असलेल्या दुसऱ्या संवर्गात आवश्यकतेनुसार पदे स्थानांतरण करण्यासाठी तसेच त्या विभागातंर्गत एकूण पद संख्येच्या मर्यादेतच असे समायोजन करण्यासाठी माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाच्या अधिनस्त असलेले माहिती व जनसंपर्क महासंचालनालयातील माहिती केंद्र, जिल्हा माहिती कार्यालय, नागपूर कार्यालय हे जिल्हा माहिती कार्यालय, नागपूर या कार्यालयात समायोजीत करून माहिती केंद्र, जिल्हा माहिती कार्यालय, नागपूर कार्यालय या कार्यालयाचे "कार्यालय प्रमुख" म्हणून जिल्हा माहिती

अधिकारी(माहिती), जिल्हा माहिती कार्यालय, नागपूर यांना घोषीत करण्याबाबतची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

०२. वरील पार्श्वभूमीवर **शासन आता पुढील प्रमाणे आदेश देत आहे**.

१) माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाच्या अधिनस्त असलेले माहिती व जनसंपर्क महासंचालनालयातील **माहिती केंद्र, जिल्हा माहिती कार्यालय, नागपूर कार्यालय हे जिल्हा माहिती कार्यालय, नागपूर या कार्यालयात समायोजीत** करण्यात येत आहे.

२) माहिती केंद्र, जिल्हा माहिती कार्यालय, नागपूर या कार्यालयाचे **"कार्यालय प्रमुख"** म्हणून **जिल्हा माहिती अधिकारी(माहिती), जिल्हा माहिती कार्यालय, नागपूर** यांना **घोषीत करण्यात येत आहे.**

०३. सदरचे आदेश हे वित्त विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण २०१५/प्र.क्र.४१/अर्थ-१, दि.०२.०६.२०१५ नुसार निर्गमित केलेल्या सुचनेनुसार प्रशासकीय विभागाला प्रशासनावर कोणताही विपरीत परिणाम न होता, अनावश्यक खर्च कमी करणे, कमी मुनष्यबळाचा वापर करुन गुणत्तेचे प्रशासन करणे याच बरोबर कामाच्या गुणवत्तेवर परिणाम न करता खर्च १०-१५% कमी करणाच्या दृष्टीने निर्गमित करण्यात येत आहे.

०४. प्रस्तुत शासन आदेश, वित्त विभाग, क्रमांक विअप्र २०१३/प्र.क्र.३०/प्र.क्र.१३/विनियम, भाग-२, दि.१७.०४.२०१५ नुसार वित्तीय अधिकार नियम पुस्तिका,१९७८ भाग पहिला, उपविभाग-एक अनुक्रमांक ३ नियम क्रमांक २ या (मुंबई वित्तीय नियम, १९५९ अतंर्गत नियमांखाली प्रदान करण्यात आलेले) वित्तीय अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

०५. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२५०५०६११५८४१५६०७ असा आहे हा शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SAMRIDHI
VIJAYKUMAR
ANGOLKAR

Digitally signed by SAMRIDHI VIJAYKUMAR ANGOLKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, 2.5.4.20=75fb066f4ac20e1679d8a5748d7e2501eac9d8a88727d55e8fe136e3ff41b40d, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=7BF9301848DB293FE7C842EAA747173CA077E63D2A87286181747EAF03076947, cn=SAMRIDHI VIJAYKUMAR ANGOLKAR
Date: 2025.05.06 11:59:16 +05'30'

**( समृद्धी वि.अनगोळकर )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रती,**

१. प्रधान सचिव ( मा.व ज. )/ महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई.
२. महालेखापाल ( लेखा व अनुज्ञयेता / लेखा परिक्षा ), महाराष्ट्र१ / २, मुंबई/नागपूर.
३. संचालक (माहिती) ( प्रशासन), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई.

४. संचालक(माहिती), विभागीय माहिती कार्यालय, छत्रपती संभाजीनगर (मावज मार्फत)
५. सहसंचालक, लेखा व कोषागारे, मुंबई-३२.(मावज मार्फत)
६. उपसंचालक ( लेखा ) माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई. . (मावज मार्फत)
७. जिल्हा माहिती अधिकारी(माहिती), विभागीय माहिती कार्यालय, छत्रपती संभाजीनगर (मावज मार्फत)
८. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
९. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
१०. सर्व विभागीय माहिती कार्यालय / जिल्हा माहिती कार्यालय, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई.(मावज मार्फत)
११. संबंधीत जिल्हा कोषागार अधिकारी. (मावज मार्फत)
१२. संबंधित जिल्हाधिकारी(मावज मार्फत)
१३. माहिती केंद्र, जिल्हा माहिती कार्यालय, छत्रपती संभाजीनगर (मावज मार्फत)
१४. वित्त विभाग /व्यय -४/कोषा-४ मंत्रालय, मुंबई.
१५. संबंधित अधिकारी / कर्मचारी यांना (मा.व ज. मार्फत)
१६. सामान्य प्रशासन विभाग, कार्यासन २५ व मावज १
१७. निवडनस्ती.